# जिद्दी म्हातारी

क्लाइड रॉबर्ट बुल्ला, चित्र: ऐनी रॉकवेल

मराठी: अश्विनी बर्वे





एकदा एक म्हातारी बाई होती जी खूप जिद्दी होती आणि नेहमी आपल्याच म्हणण्यावर अडून राहत असी. “मी करेनच!” ती म्हणे. आणि जेव्हा ती आपलं मन तयार करे तेव्हा कोणीही तिचं मत बदलू शकत नसे.

लोक तिला म्हणत, “कदाचित तू जगातली सगळ्यात जिद्दी महिला असशील.”

मग ती आपलं डोकं हलवे आणि म्हणे, “ते खरं असू शकतं.”

असं वाटतं की जसं त्या गोष्टीचा तिला गर्व आहे.



ती एका उंच, खड्या पहाडाच्या कड्यावर राहत असे. तिथं तिचं एक छोटं शेत होतं, ज्यात तिचे छोटंसं घर आणि बाग होती.

पण तिचं छोटं शेत हळूहळू उखडून जात होतं. रोज पहाडावर असलेल्या तिच्या शेताचा एक तुकडा तुटून नदीत पडत असे.



म्हाताऱ्या बाईचे शेजारी होती - एक शेतकरी, एक मेंढपाळ आणि एक गिरणी मालक. ते तिला एक एक करून भेटायला आले. आणि मग ते सगळे बरोबर भेटायला आले.

“आम्हांला तुमच्याशी बोलायचं आहे,” शेतकरी म्हणाला.

“त्याच जुन्या गोष्टीबद्दल, निःसंदेह,” म्हातारी बाई म्हणाली.

“हो," मेंढपाळ म्हणाला.

“मग मी नाही ऐकणार,”म्हातारी स्त्री म्हणाली.

“तुम्ही आमचं म्हणणं जरूर ऐकायला हवं,” गिरणी मालक म्हणाला. “तुम्ही इथं अधिक दिवस राहू शकत नाही.”

“माझ्याजवळ इथं सगळं काही आहे,” म्हातारी स्त्री म्हणाली. “जर नदी माझ्या घराला आणि बागेला गिळून टाकत असेल तर तिला मलाही गिळून टाकू द्या.”



शेजाऱ्यांनी अस्वस्थपणे मान हलवली. ते एक दुसऱ्याला हे म्हणत परत आले. “वास्तवात ती जगातील सगळ्यात जिद्दी स्त्री आहे!”



काही दिवसानंतर एक छोटी मुलगी म्हातारीच्या घरी आली.

“मी नदीच्या पलीकडून आले आहे,” ती म्हणाली, “तिथं माझ्या बहीण-भावांच्या बरोबर मी राहते. आम्ही सगळे मिळून नऊजण आहोत, आणि आम्ही अनाथ आहोत.”

“तू ही कहाणी मला का ऐकवत आहे?” म्हातारीने विचारलं.

“आम्हांला आमच्या देखभालीसाठी एखाद्या चांगल्या व्यक्तीची गरज आहे,” छोटी मुलगी म्हणाली. “अशी व्यक्ती जी आमच्यासाठी गाणं गाईन आणि आम्हांला गोष्टी सांगेन आणि एखादवेळेस आमच्या वाढदिवसाला केक सुद्धा करेल. तुम्ही माझ्या बरोबर माझ्या घरी याल का?”



“माझ्या शेजाऱ्यांनी तुला इथं पाठवलं आहे का?” म्हातारीने विचारलं.

छोट्या मुलीने ती गोष्ट नाकारली नाही. “आम्ही एका मोठ्या घरात राहतो,” ती म्हणाली. “तिथं तुमच्यासाठी एक वेगळी खोली असेल.”

"अच्छा आता जा,“ म्हातारी म्हणाली,आणि तिने दरवाजा लावण्याचा प्रयत्न केला.

पण छोटी मुलगी दरवाज्याला पाय लावून अडून बसली. “माझं घर इथून एक दिवसाच्या अंतरावर आहे, आणि सूर्य लवकरच मावळेल. कृपया मला रात्री इथं राहू द्या.”

"ठीक आहे,“ म्हातारी बाई म्हणाली.



दुसऱ्या दिवशी छोट्या मुलीने आपल्या घराची एवढ्यावेळ स्तुती करत राहिली, जोपर्यंत म्हातारी तिला जायला सांगत नाही..

“अर्धा दिवस संपला,” छोटी मुलगी म्हणाली. “मी रात्र होण्याच्या आधी आपल्या घरी पोहचू शकणार नाही.”

"पण यासाठी दोषी कोण आहे?” म्हातारी म्हणाली. “ठीक आहे, अजून एक रात्र थांब, पण त्यापेक्षा जास्त नाही.”



"धन्यवाद," छोटी मुलगी म्हणाली, “अजून मी इथं आहे, तर मी माझ्या घराबाबत अजून माहिती देते. आमच्या जवळ डुक्कर आणि कोंबड्या आणि एक गाय आहे. आमच्याजवळ द्राक्षाच्या वेली आणि एक नाशपतीचे झाड आहे. तिथं खूप छान आहे, आणि जर तुम्ही तुमचं घर सोडलं तर तिथं तुमच्याजवळ राहण्यासाठी एक चांगली जागा असेल.”

“मी हे घर कधीच सोडणार नाही,” म्हातारी म्हणाली, “आणि तू जितक्या लवकर हे समजशील तेवढं चांगलं होईल.”

दुसऱ्या दिवशी सकाळी सकाळी म्हातारीने छोट्या मुलीला उठवलं आणि तिला दरवाज्या बाहेर काढलं.



पण छोटी मुलगी मागच्या दाराने आत घुसली. “तुम्ही पण समजून घ्या,” ती म्हणाली. “मी तोपर्यंत घरी जाणार नाही जोपर्यंत तुम्ही माझ्याबरोबर येणार नाही.”

"मला वाटतं की तू जाशील,” म्हातारी म्हणाली.

“नाही" छोटी मुलगी म्हणाली.

"मला खरंच वाटतं की तू जाशील,” म्हातारी म्हणाली, आणि मग ती हळू आवाजात गाऊ लागली.

“जर तू माझ्या छताखाली झोपत आहे,

तर तुला आपल्या राहण्या खाण्यासाठी काही काम करावं लागेल.”

मग म्हातारीने छोट्या मुलीला एका नंतर एक काम करायला सांगितलं घर झाडून घे,” ती म्हणाली, “खिडक्या धू ..फरशी  पुसून घे ....कपडे धू.”



छोट्या मुलीने सगळं काही केलं जे तिला सांगितलं गेलं. रोज रात्री छोटी मुलगी म्हणे, “बघा वेळ खूप कमी आहे, तुम्ही माझ्याबरोबर येता का?”

"तुला माझं उत्तर माहित आहे,” म्हातारी म्हणाली.

असे अकरा दिवस निघून गेले.



बाराव्या दिवशी छोटी मुलगी म्हणाली, “आता वेळ उरला नाही. रात्रभर मी पहाडावरची जमीन नदीत पडतांना ऐकली आहे.”

“तर तू जा,” म्हातारी म्हणाली.

“तुम्ही माझ्याबरोबर यायला तयार आहात का?”

"तुला माझं उत्तर माहित आहे,” म्हातारी म्हणाली, आणि तिने परत गायला सुरुवात केली.

“जर तू माझ्या छताखाली झोपते आहे, तर तुला खाण्यापिण्यासाठी काही काम करायला हवं”

“मी काय करू?” छोट्या मुलीने विचारलं.

म्हातारीला घरात करण्यासारखे एकही काम सापडलं नाही. “अच्छ बागेत जाऊन तण काढ,” म्हातारी म्हणाली.

मग छोटी मुलगी बाहेर निघून गेली.



एक तास गेला, आणि मग दुसरा. छोटी मुलगी घरी परत आली नाही. म्हातारीने बाहेर जाऊन बघितलं. केवळ अर्धी बाग उरली होती. जेव्हा तिने बघितलं, तर अर्धा भाग उखडून नदीमध्ये पडला होता.

पण  छोटी मुलगी कुठे नव्हती.

“तू कुठे आहेस?” म्हातारीने जोरात आवाज दिला.

पण काहीच उत्तर आलं नाही..

“छोटी मुलगी - छोटी मुलगी!" म्हातारी ओरडली.

तरीही काहीच उत्तर आलं नाही.



म्हातारी पळत शेतकऱ्याच्या घरी गेली. “छोटी मुलगी गेली!” ती रडली.

“कुठे?" शेतकऱ्याने विचारलं.

“मी तिला बागेतलं तण काढायला पाठवलं होतं,” म्हातारी म्हणाली. “आता बाग नदीत पडली आहे, आणि त्याबरोबर ती छोटी मुलगी पण, आता मी काय करू?”

"दुःख करण्याशिवाय आपण काय करू शकतो?” शेतकरी म्हणाला.



मग म्हातारी पळत मेंढपाळाकडे गेली. “माझी बाग पडली, आणि त्याबरोबर ती छोटी मुलगी पण. जर मी तिला तिथं पाठवलं नसतं तर! आता मी काय करू?”

“आपली चूक मान्य कर,” मेंढपाळ म्हणाला.



मग म्हातारी गिरणी मालकाकडे धावत गेली. “माझी बाग पडली, आणि त्याबरोबर छोटी मुलगी पण. मीच तिला तिकडं पाठवलं होतं म्हणून मीच दोषी आहे. ओह, आता मी काय करू?”

“काय करणार? रड आणि आपले केस उपट?” गिरणी मालक म्हणाला.

"ठीक आहे मी रडेन आणि माझे केस उपटेन,” म्हातारी म्हणाली. “मला माझ्या उरलेल्या दिवसात या गोष्टीचे खूप दुःख होईन, आणी मी पूर्ण जगाला सांगेन की मी किती दुष्ट म्हातारी आहे!”

मग ती रडत आणि केस उपटत रस्त्यावर धावली.



जशी रात्र झाली, तशी ती आराम करण्यासाठी एका दगडावर बसली. तेव्हा कुशीत कोणी आलं. एका आवाजाने म्हटलं, “म्हातारे मी तुझ्यासाठी एक वाईट आणी एक चांगली बातमी आणली आहे.”

“इथून लवकर निघ,” म्हातारी म्हणाली, “कारण जगात माझ्या इतकं वाईट कोणी नाही. कधी इथं एक छोटी मुलगी होती, पण आता ती माझ्यामुळे गेली.”

“ऐक,” तो आवाज म्हणाला, “बघ, तुझं घर नदीत पडलं. ही आहे वाईट बातमी. पण चांगली बातमी ही आहे की तेव्हा घरात कोणीच नव्हतं.”



“याने काही फरक पडत नाही,,” म्हातारी म्हणाली. “माझी बाग पण नदीत पडली आणि त्याबरोबर ती छोटी मुलगी पण आणि ती सगळी चूक माझी आहे. ती खूप चांगली मुलगी होती. ती आपल्या घराबाबत छान गोष्टी सांगायची. ती खूप जिद्दी होती पण ती जगातली सगळ्यात चांगली छोटी मुलगी होती.” मग म्हातारी जोरजोरात रडू लागली. “नाही मीच जिद्दी होते. मीच कधीच कोणाची गोष्ट ऐकली नाही, पण आता ती छोटी मुलगी नेहमीसाठी निघून गेली!”

“रडणे बंद कर,” आवाज म्हणाला. “आपले डोळे उघड आणि माझ्याकडे बघ.”



जेव्हा म्हातारीने आपले केस मागे ढकलले तेव्हा तिने समोर त्या छोट्या मुलीला उभं पाहिलं.

"हे भगवान!“ म्हातारी चिखलात पडली.

“बघ, आता त्या छोट्या मुलीचे भूत मला सतावत आहे!”

"उठ," छोटी मुलगी म्हणाली. “मी भूत नाही.”

“तू भूत नाही?” मग म्हातारी उठून बसली आणि तिच्याकडे बघत म्हणाली. “मग तू इथं कशी आली?”



“तुम्ही मला बागेत पाठवलं होतं,” छोटी मुलगी म्हणाली, “पण बाग पडत होती, म्हणून मी तिथं गेले नाही. त्याऐवजी मी रस्त्यावरच्या झाडत लपून राहिले.

“तू हे चांगलं केलं का?”

“हो, मला वाटलं तुम्ही मला शोधायला निघाल.”

“तू मला ओरडतांना ऐकलं नाही का?”

“हो ऐकलं,” छोटी मुलगी म्हणाली.

“तरीपण तू काहीच उत्तर  का दिलं नाही.”

“नाही दिलं,” छोटी मुलगी म्हणाली.

“तू फार दुष्ट आहे,” म्हातारी म्हणाली.

“पण तुम्ही मला शोधत बाहेर आल्या,” छोटी मुलगी म्हणाली, “आणि अशाप्रकारे मी तुम्हांला घराबाहेर काढलं.”



आता म्हातारी हसत होती आणि रडतही होती.

“तू किती बुद्धिमान छोटी मुलगी आहेस! माझ्यापेक्षा कितीतरी समजदार. पण मी लवकरच ठीक होईन. मग मी दुसरं घर बांधेन आणि तिथं तू माझ्याबरोबर राहशील.”

“आपण नव्या घराची वाट बघू,” छोटी मुलगी म्हणाली, “तोपर्यंत तुम्ही माझ्या घरी राहण्यासाठी का येत नाही? कदाचित तिथं तुम्हांला खूप चांगलं वाटेल.”

मग त्या रात्रभर चालल्या आणि सूर्योदया पर्यंत छोट्या मुलीच्या घरी पोहचल्या. छोट्या मुलीचे सगळे बहीण भाऊ त्यांना भेटण्यासाठी धावत आले.



म्हातारीला खूप छान वाटलं. ती अनाथांची देखभाल करण्यासाठी तिथंच राहिली. तिने मुलांसाठी गाणी गायिली आणि त्यांना गोष्टी सांगितल्या आणि त्यांच्या वाढदिवसाला केक केला. मग म्हातारी एवढी जिद्दी राहिली नाही.

समाप्त